राज्य उत्पादन शुल्क विभागातील सहायक आयुक्त गट-"ब" संवर्गातील अधिकाऱ्यांची दि. ०१.०१.२०१८ रोजीची अंतिम सेवा जेष्ठता यादी.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन परिपत्रक क्र.इएसटी-१७१७/प्र.क्र.७७/ राउशु-१**
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दि. ३० नोव्हेंबर, २०१८.

**वाचा:-**

१) शासन आदेश, गृह विभाग क्र. इएसटी-२७१५/प्र.क्र.१५८/ राउशु-१, दि.०२.०७.२०१६.
२) शासन परिपत्रक, गृह विभाग क्र. इएसटी-१७१६/प्र.क्र.८१/ राउशु-१, दि.१६.०९.२०१६.
३) शासन परिपत्रक, गृह विभाग क्र. इएसटी-१७१७/प्र.क्र.७७/ राउशु-१, दि.१७.०६.२०१७.

**परिपत्रक :-**

राज्य उत्पादन शुल्क विभागातील सहाय्यक आयुक्त (गट "ब") या संवर्गातील अधिकाऱ्यांची दि.०१.०१.२०१६ रोजीची तात्पुरती सेवा जेष्ठता यादी संदर्भाधीन दि.१७.०६.२०१७ च्या परिपत्रकान्वये प्रसिद्ध करण्यात आली आहे. सदर सेवा ज्येष्ठता यादी संबंधित अधिकाऱ्यांच्या निदर्शनास आणून यादीमध्ये दर्शविलेला ज्येष्ठता क्रमांक व इतर माहितीबाबत काही आक्षेप असल्यास अथवा चुकीची माहिती दर्शविली आहे असे वाटत असल्यास यादी प्रसिद्ध झाल्याच्या दिनांकापासून १५ दिवसांच्या आत शासनास प्रतिवेदन सादर करण्याच्या सूचना संबंधित अधिकाऱ्यांना देण्याबाबत आयुक्त, राउशु यांना कळविले आहे. तथापि, संबंधितांकडून कोणत्याही हरकती/आक्षेप शासनास प्राप्त झालेले नाहीत. सबब, सदर संवर्गाची दि.१७.०६.२०१७ च्या परिपत्रकान्वये प्रसिद्ध करण्यात आलेली दि.०१.०१.२०१६ रोजीची सेवाज्येष्ठता यादी अंतिम करण्यात येत आहे.

सहाय्यक आयुक्त (गट-ब), राउशु या संवर्गामध्ये दि.०१.०१.२०१५ ते दि.३१.१२.२०१७ या कालावधीमध्ये कोणतीही नवीन नियुक्ती करण्यात आलेली नाही. त्यामुळे सहाय्यक आयुक्त (गट-ब), राउशु या संवर्गाची दिनांक ०१.०१.२०१८ रोजीची अंतिम सेवाज्येष्ठता यादी सदर परिपत्रकान्वये प्रसिद्ध करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८११३०१५०५२२५४२९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shivaji Baburao Chavan

Digitally signed by Shivaji Baburao Chavan
DN: CN = Shivaji Baburao Chavan, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home Department
Date: 2018.11.30 15:14:53 +05'30'

**( शिवाजी बा.चव्हाण )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) संबंधित अधिकारी (आयुक्त, राउशु यांचेमार्फत)
३) राउशु-१, निवडनस्ती.

शासन परिपत्रक, गृह विभाग, क्रमांक इएसटी-१७१७/ प्र.क्र.७७/ राउशु-१, दि. ३० .नोव्हेंबर, २०१८ सोबतचे विवरणपत्र

सहाय्यक आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, (गट-ब) संवर्गाची दि. ०१.०१.२०१८ रोजीची अंतिम सेवाजेष्ठता यादी.

| अ.क्र. | ज्येष्ठता क्रमांक | नाव | प्रवर्ग / जात | जन्म दिनांक | सहाय्यक आयुक्त पदावरील पदोन्नतीचा / नियुक्तीचा दिनांक | नियुक्तीचा मार्ग | ज्येष्ठता दिनांक/ ज्येष्ठतेचा मानीव दिनांक | सेवा निवृत्तीचा दिनांक | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | | ८ | ९ |
| १ | १ | श्री. शं. मा. जगताप | खुला | १५.०७.१९८५ | ०४.११.२०११ | सरळसेवा | ०४.११.२०११ | ३१.०७.२०४३ | दि.०२.०७.२०१६ च्या आदेशान्वये उप आयुक्त (क.श्रे.), राउशु पदावर पदोन्नत |
| २ | २ | श्रीमती एस. पी. मावळे | विजा (अ) | ०८.०८.१९५९ | ०८.०२.२०१२ | पदोन्नती | ०८.०२.२०१२ | ३१.८.२०१७ | सेवानिवृत्त |
| **खंड दिनांक ०१.०१.२०१५ ते दिनांक ३१.१२.२०१५** | | | | | | | | | |
| **खंड दिनांक ०१.०१.२०१६ ते दिनांक ३१.१२.२०१६** | | | | | | | | | |
| **खंड दिनांक ०१.०१.२०१७ ते दिनांक ३१.१२.२०१७** | | | | | | | | | |

Shivaji Baburao Chavan

Digitally signed by Shivaji Baburao Chavan
DN: CN = Shivaji Baburao Chavan, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home Department
Date: 2018.11.30 15:18:04 +05'30'

**( शिवाजी बा. चव्हाण)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**टीप: श्री. अनुप बसवराज पुराणिक यांची एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण-२ कार्यक्रम (सीपीटीपी-२) प्रशिक्षणांअंती, या विभागामध्ये दि.१५.०१.२०१८ च्या आदेशान्वये नियुक्ती केली आहे. तथापि, त्यांचा परिविक्षाधीन कालावधी संपुष्टात आणला नसल्यामुळे त्यांचे नाव सदर सेवा ज्येष्ठता यादीमध्ये समाविष्ट केले नाही.**